महाराष्ट्र राज्य पालीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळातील कर्मचाऱ्यांना ५ वा वेतन आयोग लागू करणे.

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन निर्णय क्र.पीएचसी-०४००/प्र.क्र.१६/भाग-२/पोल-७,
मंत्रालय, मुंबई-३२, दिनांक १२ मे,२००४.

वाचा:- १) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाचे क्र.पोगृम/आस्था/५ वा वेतन आयोग/२६८/२००१, दि.१३.२.२००१ व २३ मे,२००१ चे पत्र.

प्रस्तावना:- पोलीस व तुरुंग विभागातील कर्मचाऱ्यांना शासकीय निवासस्थाने तातडीने उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने तसेच पोलीसांच्या कल्याणाकरिता आवश्यक ती बांधकामे "ना नफा ना तोटा" या तत्त्वावर करण्यासाठी सन १९७४ साली महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाची स्थापना करण्यात आली आहे. सदर महामंडळात एकूण ३८ पदे मंजूर असून त्यापैकी १० पदे प्रति नियुक्तीने भरण्यात आली आहेत. सदरहू १० कर्मचारी राज्य शासनाच्या वेगवेगळया विभागातील असल्यामुळे त्यांना ५ व्या वेतन आयोगाप्रमाणे वेतन मिळते. त्यांच्याप्रमाणेच समान पदावर व सारख्या स्वरुपाचे काम करीत असलेल्या उर्वरित अधिकारी व कर्मचारी यांना ५ व्या वेतन आयोगाप्रमाणे वेतनश्रेणी लागू करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय:- महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाच्या खाली नमूद केलेल्या संवर्गातील अधिकारी/कर्मचाऱ्यांना दि. १.४.२००४ पासून ५ व्या वेतन आयोगानुसार पुढीलप्रमाणे वेतनश्रेणी लागू करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पद | सध्याची वेतन श्रेणी | ५ व्या वेतन आयोगानुसार द्यावयाची वेतन श्रेणी |
|---|---|---|---|
| १ | उप अभियंता | रु.२२००-७५-२८००-इबी-१००-३७०० | रु.८०००-२७५-१३५०० |
| २ | कनिष्ठ अभियंता | रु.१६४०-६०-२६००-इबी-७५-२९०० | रु.५५००-१७५-९००० |
| ३ | निम्नश्रेणी लघुलेखक | रु.१६४०-६०-२६००-इबी-७५-२९०० | रु.५५००-१७५-९००० |
| ४ | वरीष्ठ लिपिक | रु.१२००-३०-१५६०-इबी-४०-२०४० | रु.४०००-१००-६००० |
| ५ | कनिष्ठ लिपिक | रु.९५०-२०-११५०-इबी-२५-१५०० | रु.३०५०-७५-३९५०-८०-४५०० |
| ६ | वाहन चालक | रु.९५०-२०-११५०-इबी-२५-१५०० | रु.३०५०-७५-३९५०-८०-४५०० |

| | | | |
|---|---|---|---|
| ७ | नाईक | रु.७७५-१२-९५५-इबी-१५-१०३०-२०-११५० | रु.२६१०-६०-२९१०-६५-३३००-७०-४००० |
| ८ | झेरॉक्स ऑपरेटर | रु.७७५-१२-९५५-इबी-१५-१०३०-२०-११५० | रु.२६१०-६०-२९१०-६५-३३००-७०-४००० |
| ९ | शिपाई | रु.७५०-१२-८७०-इबी-१४-९४० | रु.२५५०-५५-२६६०-६०-३२०० |

२. वरील पदांच्या वेतन व भत्यावरील खर्च महामंडळाच्या प्रचलित पध्दतीप्रमाणे त्या त्या कामावर वर्ग करुन भागविण्यांत यावे.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्र.११३/साउ व अनौ.सं.क्र.१७०/२००४/सेवा-९,दि. ३.५.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( क. गो. देशपांडे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ,वरळी, मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र,मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग (सा. क्र.), मंत्रालय,मुंबई.
निवड नस्ती (पोल-७).

*****